नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका हद्दीतील एकूण तीन रस्ते अवर्गीकृत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- रवियो-२०१७/प्र.क्र.४०/नियोजन-२**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ०२ मे, २०१७.

पहावे :-

१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांचे पत्र जा.क्र./मुअऔ/का-१४/प्रआ/रस्तेहस्तांतरण/१५८०/वप्र.दिनांक ०३/०४/२०१७.

२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांचे पत्र जा.क्र./मुअऔ/का-१४/ प्रआ/रस्ते हस्तांतरण. दिनांक १९/०४/२०१७.

**प्रस्तावना :-**

नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका हद्दीतील एकूण तीन रस्ते अवर्गीकृत करणेबाबतचा प्रस्ताव मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांनी सादर केलेला आहे.तसेच सदरच्या प्रस्तावात नांदेड वाघाळा शहर महानगरपालिकेने रस्ते अवर्गीकृत करण्याबाबत केलेल्या मागणीच्या अनुषंगाने नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका हद्दीतील एकूण तीन रस्ते अवर्गीकृत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, औरंगाबाद यांचा प्रस्ताव तसेच संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक- आरबीडी-१०८१/८७१/रस्ते-७, दि. ०९/०३/२००१ मधील टिप ५ मधील तरतूद विचारात घेऊन, नांदेड जिल्ह्यातील नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका हद्दीतील खालील नमूद केलेले रस्ते अवर्गीकृत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | रवियो २००१-२१ नुसार रस्त्याचे नाव | अवर्गीकृत करावयाच्या रस्त्याची लांबी व साखळी क्रमांक | एकूण लांबी |
|---|---|---|---|
| १. | तिसगांव-अमरापूर- शेवगांव -पैठण- अंबड-घनसावंगी-कुंभारपिंपळगांव-आष्टी-पाथरी-पोखर्णी-पुर्णा-नांदेड रस्ता (रा.मा.-६१) | बजाज फंक्शन हॉल -छत्रपती चौक-तरोडा चौक-राज कॉर्नर-वर्कशॉप कॉर्नर-आनंदनगर चौक ते नागार्जुन हॉटेल ३३७/०० ते ३४१/१५ | ४.१५ कि.मी. |
| | | महात्मा फुले चौक ते वर्कशॉप कॉर्नर ( रा.मा. ६१ चा भाग) | १.५० कि.मी. |
| | | महात्मा फुले चौक ते आण्णाभाऊ साठे चौक ( रा.मा. ६१ चा भाग) | १.५० कि.मी. |

| | | | |
|---|---|---|---|
| २. | वापी-पेठ-नाशिक-निफाड-येवला-वैजापूर-औरंगाबाद-जालना-मंठा-जिंतूर-औंढा-वसमत-अर्धापूर फाटा-नांदेड-धनेगांव (जं) (प्र.रा.मा.-२) | डॉ. शंकरराव चव्हाण चौक-माळटेकडी-गुरूद्वारा-नमस्कार चौक -महाराणा प्रताप चौक-बाफना-रेल्वे स्टेशन-देगलूर नाका-जुना गोदावरी पूल-वाजेगांव रस्ता ५११/०० ते ५२३/०० | १२.०० कि.मी. |
| ३. | उभारा (कळमनुरी)-साडेगांव-बोल्डा-कुरूंदा-वसमत-आलेगांव-निळा-नांदेड-वाघाळा रस्ता (रा.मा.-२५६) | जुना मोंढा- गोदावरी पूल-डॉ. आंबेडकर चौक ७२/२० ते ७५/७०० | ३.५० कि.मी. |
| | **एकूण** | | **२२.६५० कि.मी.** |

अशी एकूण **२२.६५० कि.मी.** लांबी अवर्गीकृत करण्यात येत आहे. तसेच सदर रस्त्यांच्या देखभाल-दुरुस्तीचा खर्च नांदेड वाघाळा शहर महानगरपालिकेकडून करण्यात येईल व अवर्गीकृत केलेल्या रस्त्यांवर होणाऱ्या देखभाल-दुरूस्ती करिता शासनामार्फत कोणतेही अतिरिक्त अनुदान देण्यात येणार नाही . या अटीच्या अधीन राहून सदर रस्त्यांना अवर्गीकृत करण्यास शासन मान्यता देत आहे.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१७०५०२१५३०४३७४१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2017.05.02 16:24:51 +05'30'

**( प्रशांत पाटील )**

अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

२. विभागीय आयुक्त, औरंगाबाद.

३. अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, नांदेड (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करण्यात यावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
४. जिल्हाधिकारी, नांदेड.
५. आयुक्त, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका .
६. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नांदेड.
७. कार्यकारी अभियंता, (सा.बां.) जिल्हा परिषद, नांदेड.
८. संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
९. रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
१०.निवडनस्ती.